सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद
या कार्यालयाच्या आस्थापनेवरील रोजंदारी
तत्वावर निर्माण करण्यात आलेल्या गट-क
आणि गट-ड मधील ४ पदांना मुदतवाढ

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१८/ प्र.क्र.४०६/का. २८**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०८ ऑक्टोबर, २०१८

वाचा-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण-२००२/१९७३/प्र.क्र.२११/२००२/२८, दि.१६/१०/२००२.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक- १००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४/१०/२००४.
३) शासन निर्णय, संकिर्ण-२०१८/प्र.क्र.१४२/का-२८ दि. २३/०३/२०१८
४) शासन निर्णय, शुध्दीपत्रक क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.०८/०१/२०१८
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क, दि.०७/०९/२०१८

प्रस्तावना-

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयातील आस्थापनेवर संदर्भाधीन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण २००२/१९७३/प्र.क्र.२११/२००२/२८,दि.१६/१०/२००२ अन्वये गट-क व गट-ड मधील ४ पदे रोजंदारी तत्वावर निर्माण करण्यास आणि सदर पदे विहित पध्दतीने भरण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधिन दिनांक ०४/१०/२००४ च्या शासन निर्णयान्वये अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने वेळोवेळी मुदतवाढ दिली असून सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय संकिर्ण-२०१८/प्र.क्र.१४२/का-२८ दि.२३/०३/२०१८ अन्वये हया पदांना दिनांक ०१/०३/२०१८ ते दिनांक ३०/०९/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

**शासन निर्णय**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयाच्या आस्थापनेवरील रोजंदारी तत्वावर निर्माण करण्यात आलेली खालील नमूद गट-क आणि गट-ड मधील ४ रोजंदारीची पदे दिनांक ०१/१०/२०१८ ते दिनांक २८/०२/२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | गट- क | | |
| | शारिरिक प्रशिक्षण निदेशक | रु.४०००-१००-६००० | १ |
| | भांडारपाल | रु.३०५०-७५-४५९० | १ |
| २ | गट-ड | | |
| | पहारेकरी | रु.२५५०-५५-३२०० | १ |
| | मसालची | रु.२५५०-५५-३२०० | १ |
| | एकूण | | ४ |

२. संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांनी सदर रोजंदारी पदावरील नियुक्त करण्यात येणा-या व्यक्तींची नियुक्ती ही दर महिन्यातील जास्तीत जास्त २८ दिवसांकरीता करण्यात यावी. त्यानंतर सदर व्यक्तीस किमान तीन दिवसांचा तांत्रिक खंड देण्यात येऊन पुन: नियुक्ती करण्यास हरकत नाही. तथापि, अशा व्यक्तींचा रोजंदारी पदावरील एकूण नियुक्तीचा कालावधी हा तीन महिन्यांपेक्षा जास्त असणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. यासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक. ए-५, लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, (२००)- इतर कार्यक्रम (००) (०५) सेवा पूर्वाध्ययन संस्था (२२ ३५ ००७१) योजनेत्तर “ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन सन २०१८-२०१९" या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दिनांक ०७/०९/२०१८ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१११२५०१९७६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh
Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=14c299447f4a6e6c33ab3f7a85fbf010628981e82f8311a81d1cf974681485c2, serialNumber=f0b4c833a6fc7c6fb7cb0a96a3e2bb79d42d283b8f0f7bfc1ae95298d60bacf1, cn=Suresh Mahadeo Khade
Date: 2018.10.11 12:58:41 +05'30'

**( सु.म.खाडे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको एन-१२, सेक्टर-३, मौलाना आझाद कॉलेजच्या मागे, नवीन औरंगाबाद - ४३१००३,
२. महालेखापाल (लेखा व परीक्षा) - १/२, महाराष्ट्र ( मुंबई / नागपूर),
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १/२, महाराष्ट्र (मुंबई / नागपूर),
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, औरंगाबाद,
५. सामान्य प्रशासन विभाग (कार्या-२५),मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. वित्त विभाग, व्यय-४, कार्या-आपुक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
७. निवड नस्ती (२ प्रती).